**शासन निर्णय दिनांक ४ सप्टेंबर,२०१४ पूर्वीच्या राज्य / राष्ट्रीय आदर्श शिक्षक पुरस्कार प्राप्त ३५ शिक्षकांना दोन आगाऊ वेतनवाढी मंजूर करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**

**शासन निर्णय क्रमांक :- न्यायप्र-२०१८/प्र.क्र.०९/टीएनटी-४**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय विस्तार भवन, मुंबई ४०० ०३२.

दिनांक :- १७ मार्च, २०२५

<u>संदर्भ</u>:- १) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्र. संकीर्ण-२०१२/सं.क्र.२४८/१२/टीएनटी-२, दिनांक ४ संप्टेबर,२०१४.

२) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्र. पीटीसी-२०१५/प्र.क्र.१५४/टीएनटी-४, दिनांक २५ जोनवारी २०१७.

**<u>प्रस्तावना :-</u>**

राज्य /राष्ट्रीय आदर्श शिक्षक पुरस्कार प्राप्त शिक्षकांना दि.३०.४.१९८४ च्या शासन निर्णयानुसार दोन आगाऊ वेतनवाढी अनुज्ञेय होत्या. सहावा वेतन आयोग राज्यात शासकीय कर्मचाऱ्यांना दि.१.४.२००९ च्या शासन निणर्यान्वये लागू झाला. सहावा वेतन आयोग लागू केल्यानंतर त्यामधील तरतूदीनुसार आगाऊ वेतनवाढी देण्याची योजना लागू करण्यात आली नाही. शिक्षकांना सहावा वेतन आयोग दि.१२.६.२००९ च्या शासन निणर्यान्वये लागू करण्यात आला. राज्य शासकीय कर्मचाऱ्यांना आगाऊ वेतनवाढी देण्याबाबत, सामान्य प्रशासन विभागाने अद्याप निर्णय घेतलेला नाही. आदर्श शिक्षक पुरस्कार प्राप्त शिक्षकांना ठोक रक्कम रु.१,००,०००/- (रु.एक लाख फक्त) अदा करण्याबाबतचा निर्णय शासनाने जाणीवपूर्वक घेतला व त्यानुसार संदर्भाधीन क्रमांक १ येथील दि. ३०.४.१९८४ चा शासन निर्णय अधिक्रमित करुन, सन २०१३-१४ या आर्थिक वर्षामध्ये तसेच त्यानंतरच्या वर्षांमधे राज्य/राष्ट्रीय आदर्श शिक्षक पुरस्कार प्राप्त शिक्षकांना वेतनवाढी ऐवजी प्रोत्साहनात्मक रक्कम म्हणून रु.१,००,०००/- (रु.एक लाख फक्त) इतकी ठोक रक्कम अदा करण्यास संदर्भाधीन क्रमांक १ येथील दि.४.९.२०१४ च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली.

सन २००५-०६ ते सन २०१२-१३ या काळातील राज्य/राष्ट्रीय पुरस्कार प्राप्त शिक्षकांना आगाऊ वेतनवाढी न मिळाल्याने मा. उच्च न्यायालय, खंडपीठ नागपूर येथे श्री. दिलीप कळमकर व इतर १८ विरुध्द महाराष्ट्र शासन, श्रीमती मनीषा महात्मे आणि इतर १० विरुध्द महाराष्ट्र शासन तसेच श्री. सुरेश भोवटे आणि इतर ७ विरुध्द महाराष्ट्र शासन अशा एकूण ३८ याचिकाकर्त्यांनी अनुक्रमे याचिका क्र.१९४/१४, ५४३०/१४ व ६११६/१४ दाखल केल्या. सदरहू तीनही याचिकासंदर्भात मा. उच्च न्यायालयाने एकत्रितरित्या दि.१६.१२.२०१४ च्या आदेशान्वये याचिकाकर्त्यांना आगाऊ वेतनवढीची रक्कम सहा महिन्यांच्या आत अदा करण्याचे आदेश पारित करुन रिट याचिका निकाली काढल्या. परंतू सदर आदेशाचे पालन न झाल्याने विविध अवमान याचिका व मा.मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील बैठकीतील

निर्णयाच्या अनुषंगाने संदर्भाधीन क्र.२ अन्वये शिक्षकांना आगाऊ वेतनवाढी देण्याबाबत शासन निर्णय निर्गमित करण्यात आला आहे.

तदनंतर शासन निर्णय दिनांक ४ सप्टेंबर २०१४ पूर्वीच्या राज्य/राष्ट्रीय आदर्श शिक्षक पुरस्कार प्राप्त शिक्षकांना आगाऊ वेतनवाढी न मिळाल्याने मा.उच्च न्यायालय, खंडपीठ मुंबई येथे श्री. अनंत सखाराम जाधव व इतर विरुध्द महाराष्ट्र शासन रिट याचिका क्र.१३४४०/२०१७ दाखल केली होती. सदरहू याचिकासंदर्भात मा.उच्च न्यायालयाने दिनांक ९ जून २०२२ व दिनांक २२ जून २०२२ च्या आदेशान्वये याचिकाकर्त्यांना आगाऊ वेतनवाढीची रक्कम सहा महिन्याच्या आत अदा करण्याचे आदेश पारित करुन रिट याचिका निकाली काढली आहे.

त्याअनुषंगाने रिट याचिका क्र.१३४४०/२०१७ मधील मा. उच्च न्यायालयाच्या निर्देशानुसार शासन निर्णय दिनांक ४ संप्टेबर २०१४ पूर्वीच्या आगाऊ वेतनवाढी मंजूर न झालेल्या राज्य/ राष्ट्रीय आदर्श शिक्षक पुरस्कार प्राप्त एकूण ३५ पात्र शिक्षकांना दोन आगाऊ वेतनवाढी मंजूर करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

रिट याचिका क्र.१३४४०/२०१७ मधील मा. उच्च न्यायालयाच्या निर्देशानुसार शासन निर्णय दिनांक ४ संप्टेबर २०१४ पूर्वीच्या आगाऊ वेतनवाढी मंजूर न झालेल्या राज्य/राष्ट्रीय आदर्श शिक्षक पुरस्कार प्राप्त एकूण ३५ शिक्षकांना दोन आगाऊ वेतनवाढी मंजूर करण्याबाबत शासन खालील प्रमाणे आदेश देत आहे-

(१) राज्य पुरस्कार प्राप्त दि.०७ फेब्रुवारी, २०१४ च्या शासन निर्णयातील २७ शिक्षक

(२) राष्ट्रीय शिक्षक पुरस्कार प्राप्त दि.०९ ऑगस्ट, २०१४ च्या परिपत्रकातील ०८ शिक्षक
२०१४ च्या आदेशातील ०२ शिक्षक

(वरील १, २ मुद्याबाबतची यादी परिशिष्ट - अ मध्ये सोबत जोडलेली आहे)

अ. दि.०४ सप्टेंबर, २०१४ च्या शासन निर्णयान्वये राष्ट्रीय व राज्य आदर्श शिक्षक पुरस्कार प्राप्त शिक्षकांना आगाऊ दोन वेतनवाढी ऐवजी अदा केलेली रु.१,००,०००/- (एक लाख) ठोक रक्कम वजा करण्यात यावी.

ब. उपरोक्त प्रस्तावाचे अनुषंगाने येणारा खर्च संबंधित शिक्षकांचे वेतन ज्या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात येते त्या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

क. सदर शासन निर्णय रिट याचिका क्र.१३४४०/२०१७ मधील केवळ पात्र ठरलेल्या राज्य/राष्ट्रीय आदर्श शिक्षक पुरस्कार प्राप्त शिक्षकांना लागू राहील. सदर शासन निर्णय हा कोणत्याही परिस्थितीत पूर्वोदाहरण म्हणून लागू करता येणार नाही.

ड. सदर पुरस्कार प्राप्त शिक्षकांना वेतनवाढी अथवा वेतनाची रक्कम दोनदा अदा केली जाणार नाही याची दक्षता संबंधीत आहरण व संवितरण अधिकारी यांनी घ्यावी.

इ. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रंमाक १०४४/व्यय-५ दि.१०.१०.२०२४ अन्वये दिलेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०३१७१७२७५४०९२१ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

TUSHAR VASANT MAHAJAN

Digitally signed by TUSHAR VASANT MAHAJAN
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORT DEPARTMENT, 2.5.4.20=19c6c23f510a80926e9b7ee5db235979452f3f9e8918118634069a6cc7a22b9f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=1A39CEF3C157B9EE6A2ABE5779ACF233682613F7B9C335D6BF4877267695CECA, cn=TUSHAR VASANT MAHAJAN
Date: 2025.03.17 17:28:47 +05'30'

**( तुषार महाजन )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. मंत्री, शालेय शिक्षण विभाग यांचे खाजगी सचिव
२) मा. राज्यमंत्री, शालेय शिक्षण विभाग यांचे खाजगी सचिव
३) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, १/२, मुंबई/नागपूर.
४) मा. मुख्य सचिव यांचे उपसचिव, मा. मुख्य सचिव कार्यालय, मंत्रालय, मुंबई
५) महालेखापाल (लेखा परीक्षा) महाराष्ट्र, १/२. मुंबई/नागपूर.
६) आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे.
७) शिक्षण संचालक, (माध्यमिक व उच्च माध्यमिक) महाराष्ट्र राज्य, पुणे.
८) शिक्षण संचालक, (प्राथमिक) महाराष्ट्र राज्य, पुणे.
९) सर्व विभागीय शिक्षण उपसंचालक
१०) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
११) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.
१२) मुख्य लेखापरीक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकणभवन, नवी मुंबई.
१३) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१४) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१५) शिक्षण निरीक्षक, वृहन्मुंबई (पश्चिम/उत्तर/दक्षिण)
१६) सर्व शिक्षणाधिकारी (प्राथमिक/माध्यमिक/योजना), जिल्हा परिषद.
१७) सर्व अधीक्षक, वेतन पथक (प्राथमिक/माध्यमिक/योजना)
१८) मा. मंत्री, शालेय शिक्षण विभाग यांचे खाजगी सचिव
१९) मा. प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग यांचे स्वीय सहाय्यक
२०) सर्व कार्यासने, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
२१) कार्यासन व्यय-५, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
२२) कार्यासन - ८, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
२३) निवड नस्ती, टीएनटी-४.

**परिशिष्ट- अ**

**मा. उच्च न्यायालयाच्या रिट याचिका क्र.१३४४०/२०१७ बाबत दिलेल्या न्यायनिर्णयानुसार दोन वेतनवाढी द्यावयाच्या पात्र शिक्षकांची यादी.**

**शा. नि.क्र. न्यायप्र २०१८/प्र.क्र.०९/टीएनटी-४, दि.१७.०३.२०२५ चे सहपत्र (राज्य पुरस्कार प्राप्त शिक्षक)**

| अ.क्र | रिट याचिकेतील अ.क्र. | पात्र पुरस्कार प्राप्त शिक्षकांची नावे | शाळेचे नाव |
|---|---|---|---|
| १ | १ | श्री. अनंता सखाराम जाधव (सहायक शिक्षक) | जि.प.प्राथमिक शाळा, आतकरवाडी, .पुरंदर,जि.पुणे |
| २ | ३ | श्रीम. शशिकला एकनाथ पाटील (सहायक शिक्षिका) | केंद्रीय प्राथमिक शाळा, नेसरी, ता.गडहिंग्लज, जि.कोल्हापुर. |
| ३ | ४ | श्री.शिवराज विठ्ठल सावंत (सहायक शिक्षक) | जि.प. पूर्ण प्राथमिक शाळा,मालवण -दांडी, ता.मालवण जि.सिंधुदुर्ग |
| ४ | ५ | श्री.हणमंत बाबुराव देशमुख (सहायक शिक्षक) | छत्रपती संभाजी विदयालय शिवनगर (रेठरे बु.), ता.कराड, जि.सातारा |
| ५ | ६ | श्री.आनंदकुमार निवृत्ती जाधव (मुख्याध्यापक) | बॅ.नाथ पै. विद्यालय व ज्यु. कॉलेज हर्चे, ता.लांजा, जि.रत्नागिरी |
| ६ | ९ | श्रीम. हेमलता प्रकाश जोशी (मुख्याध्यापिका) | जि.प.प्राथमिक शाळा, पिंपळखुटा, ता. जि.औरंगाबाद |
| ७ | १० | श्री.रावसाहेब पुजांजी भोसले (मुख्याध्यापक) | जि.प.केंद्रीय प्राथमिक शाळा, शाखा वसमतनगर, ता. वसमत, जि.हिंगोली |
| ८ | ११ | श्री. गणेश बबनराव स्वामी सहायक शिक्षक (चित्रकला) | श्री. शिवाजी विद्यालय पिगंळेनगर, कॅनॉल रोड, बीड, जि. बीड |
| ९ | १२ | श्रीम. शोभा सदाशिवराव तिडके (सहायक शिक्षिका) | जि.प.केंद्रीय प्राथमिक शाळा, अशोकनगर ता.जि.बीड |
| १० | १३ | श्री.जालिंदर मसुराम पैठणे (मुख्याध्यापक) | ग्रामीण माध्यमिक उच्च माध्यमिक विदयालय, नेकणुर. ता. जि.बीड |
| ११ | १४ | श्री.राजसाहेब पुंडलिंकराव शिंदे (सहायक शिक्षक) | श्री.माणिकप्रभू विदयालय,जेवळी, ता. जि.लातूर |
| १२ | १६ | श्री. प्रभाकर रामदास पाटील (सहायक शिक्षक) | जि.प.उच्च प्राथमिक शाळा, फरकांडे, ता.एरंडोल, जि.जळगांव |
| १३ | १७ | श्री. अनारसिंग विश्राम चव्हाण (सहायक शिक्षक) | जि.प.प्राथमिक शाळा , पाल, ता.रावेर, जि.जळगांव |
| १४ | १९ | श्री. दादा पुंजाराम ठाकुर (सहायक शिक्षक) | जि.प.प्राथमिक शाळा,उमर्दा, ता.शिरपुर, जि.धुळे |

| | | | |
|---|---|---|---|
| १५ | २० | श्री. अनिल विज्ञान महिरराव (सहायक शिक्षक) | जि.प.शाळा, लाकडया हनुमान, ता.जि.शिरपुर, जि.धुळे |
| १६ | २१ | श्री. मंगला तंबडु पाटील (सहायक शिक्षिका) | जि.प. शाळा, अर्थे (बु.),ता.शिरपुर.जि.धुळे |
| १७ | २२ | श्री.विजय बाळकृष्ण डेर्ले (सहायक शिक्षक) | जि.प.प्राथमिक शाळा, निफाड नं-१, ता.निफाड, जि.नाशिक |
| १८ | २३ | श्री.भिला नानाजी अहिरे (सहायक शिक्षक) | जि.प. प्राथमिक शाळा, खंबाळे, ता.ईगतपुरी जि.नाशिक |
| १९ | २४ | श्री.सोनु गोंडु चौरे (सहायक शिक्षक) | जि.प.प्राथमिक शाळा, मास्तरवाडी,ता.त्र्यंबकेश्वर, जि.नाशिक |
| २० | २५ | श्री.शिवाजी भागोजी शिरसाट (मुख्याध्यापक) | ज्योती विद्यालय,पिंपळगांव बहुला (त्र्यंबकेश्वर रस्ता) ता.जि. नाशिक |
| २१ | २७ | श्रीम.सीमा मधुकर मुनगीनवार (सहायक शिक्षिका) | जि.प.उर्दू प्राथमिक मराठी शाळा, दिघी ता. बाभुळगाव जि.यवतमाळ |
| २२ | २९ | श्री.साहेबराव धोंडबाजी हटवार (सहायक शिक्षक) | मोहनाबाई कन्या विद्यालय, दिग्रस, जि.यवतमाळ |
| २३ | ३३ | श्री.गणेश भागवतजी सार्वे (सहायक शिक्षक) | जिल्हा परिषद हायस्कूल, वरठी, ता. मोहाडी, जि. भंडारा |
| २४ | ३४ | श्री.राजकुमार चिंधूजी एकवनकर (सहायक शिक्षक) | मु.पो. मांगरुड, ता.नागभिड जि.चंद्रपूर |
| २५ | ३५ | श्री.सुनील जयराम कोहपरे मुख्याध्यापक (उच्चश्रेणी) | जि.प.उच्च प्राथमिक शाळा, दिघोरी, प.स.पोंभुर्णा, जि.चंद्रपूर |
| २६ | ३६ | श्री.संजय शुरेशराव शास्त्री (सहायक शिक्षक) | जि.प. केंद्रीय प्राथमिक कन्या शाळा ,भोकरदन ,ता. भोकरदन ,जि. जालना |
| २७ | ३७ | श्री.प्रभाकर गोमाजी साखरे (सहायक शिक्षक) | जि.प.उच्च प्राथमिक शाळा, ता.चांदाळा, जि.गडचिरोली. |

**शा. नि.क्र. न्यायप्र २०१८/प्र.क्र.०९/टीएनटी-४, दि.१७.०३.२०२५ चे सहपत्र (राष्ट्रीय पुरस्कार प्राप्त शिक्षक)**

| अ.क्र | रिट याचिकेतील अ.क्र. | शिक्षकांची नाव | शाळेचे नाव |
|---|---|---|---|
| १ | १५ | श्री. संजय भानुदास पाटील (सहायक शिक्षक) | जि.प.प्राथमिक शाळा, केकाट निंबोरे ता. जामनेर, जि. जळगाव |
| २ | ८ | श्रीम. संगीता भिकनराव चव्हाण (सहायक शिक्षिका) | जि.प. प्राथमिक शाळा, सिडॉन सेंन्टर सातारा ,ता. जिल्हा-औरंगाबाद |

| | | | |
|---|---|---|---|
| ३ | २ | श्री.श्रीकांत श्रीपती पाटील (सहायक शिक्षक) | श्री.बलवंतराव यादव हायस्कुल पेठ वडगांव, ता.हातकणंगले, जि.कोल्हापुर |
| ४ | १८ | श्री.अशफाक खान सईद खान पिंजारी (सहायक शिक्षक) | अँग्लो उर्दु हायस्कुल, मु.पो. दोंडाईचा,ता.सिदंखेडा, जि.धुळे |
| ५ | २६ | श्री.सुनिल शभुंदयाल नायक (मुख्याध्यापक) | ज्ञान विकास माध्यमिक विदयालय, नंदनवन कॉलनी, जि.नागपूर |
| ६ | २८ | श्री. आनंदराव अवधूतराव देशमुख (सहायक शिक्षक) | जि.प. उच्च प्राथमिक शाळा, मोहादरी, ता. उमरखेड, जि.यवतमाळ |
| ७ | ३० | श्रीम.चित्रा सुभाषराव ढोले (सहायक शिक्षिका) | जि.प.प्राथमिक शाळा, हिवरी, ता. जि.यवतमाळ |
| ८ | ३१ | श्रीम.लिला अरुणकुमार झंवर (सहायक शिक्षिका) | नारायणदास लड्डा हायस्कूल अमरावती,जि.अमरावती |

************************************